**अर्थसंकल्पीय अनुदान २०१०-११**
**मागणी क्र.वाय-०४, २७०२ लहान पाटबंधारे भूजल संपत्तीचे अन्वेषण व विकास आस्थापना (योजनेतर)**

**महाराष्ट्र शासन**
**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग,**
**शासन निर्णय क्र.बीयुडी-१०१०/प्र.क्र.१२८ /पापु-१५,**
**मंत्रालय, मुंबई ४०००३२**
**दिनांक - १७ मार्च,२०११**

**वाचा**-१) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अंदाज-२०१०/सीआर ६५/अर्थसंकल्प-३ दिनांक १८ मे,२०१०
२) पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, शासन निर्णय क्र.बीयुडी-१०१०/प्र.क्र.१२८/पापु-१५ दि.२८ एप्रिल, २०१०, दि.२८ जून,२०१०व दि.११ ऑक्टोबर,२०१०

**प्रस्तावना:-**

सन २०१०-२०११ या आर्थिक वर्षासाठी विधिमंडळाला सादर करण्यात आलेला अर्थसंकल्प महाराष्ट्र विनियोजन अधिनियम, २०१० (महाराष्ट्र विनियोजन (लेखानुदान) अधिनियम २०१० यांच्या अनुसूचीच्या स्तंभ ४ मध्ये विनिर्दिष्ट करण्यात आलेल्या रकमांसह) विधिमंडळाने मंजूर केला आहे आणि ते २०१० चा अधिनियम क्रमांक ८ म्हणून महाराष्ट्र राजपत्र असाधारण, भाग-८, दिनांक २७ एप्रिल, २०१० अन्वये प्रसिध्द करण्यात आला आहे.

२. सन २०१०-११ या आर्थिक वर्षासाठी भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणेच्या आस्थापनेचा खर्च भागविण्यासाठी "२७०२- लहान पाटबंधारे २७०२ ३९१८" या लेखाशीर्षाखाली एकूण रु.१९८१.६५ लक्ष तरतूद मंजूर करण्यात आली आहे. पैकी , संदर्भ क्र.२ येथील शासन निर्णयान्वये रु.१९७८.४३ लक्ष अनुदान संचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, पुणे यांना उपलब्ध करुन देण्यात आलेले आहे. आता, आस्थापनाविषयक खर्च भागविण्यासाठी सदर लेखाशीर्षाखालील ०१ वेतन या उपशीर्षाखाली रु.३.२२ लक्ष अनुदान संचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, पुणे यांना उपलब्ध करुन देण्याची बाब विचाराधीन आहे.

**शासन निर्णय:-**

सन २०१०-११ या आर्थिक वर्षात भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणेच्या आस्थापना व इतर अनुषंगीक बाबींवरील खर्च भागविण्यासाठी पुढील विवरणपत्रात स्तंभ ५ मध्ये दर्शविल्याप्रमाणे **०१ - वेतन या उपशीर्षाखाली रु.३.२२ लक्ष ( रुपये तीन लक्ष बावीस हजार फक्त)** दत्तमत्त इतके अनुदान **संचालक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, पुणे यांना या शासन निर्णयाव्दारे मंजूर व मुक्त करण्यात येत आहे.**



**कृ.मा.पहा....**

(रु. लाखात)

| अ. क्र | उपशिर्ष | सन २०१०-११ करिता मंजूर तरतूद | आतापर्यंत उपलब्ध करुन दिलेले अनुदान | या शासन निर्णयान्वये मंजूर करण्यात येत असलेले अनुदान |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३. | ४. | ५. |
| १. | ०१ वेतन | १८५२.०३ | १८४८.८१ | ३.२२ |
| २. | ०३ अतिकालीक भत्ता | ३.९० | ३.९० | ०.०० |
| ३. | ०६ दुरध्वनी वीज देयके | ७.०० | ७.०० | ०.०० |
| ४. | १० कंत्राटी सेवा | ०.४० | ०.४० | ०.०० |
| ५. | ११ प्रवास खर्च | ४९.३५ | ४९.३५ | ०.०० |
| ६. | १३ कार्यालयीन खर्च | २५.६८ | २५.६८ | ०.०० |
| ७. | १४ भाडे,पट्टी व कर | २५.०० | २५.०० | ०.०० |
| ८. | १७- संगणकावरील खर्च | १.११ | १.११ | ०.०० |
| ९. | २०, इतर प्रशासकीय सेवा | ०.०१ | ०.०१ | ०.०० |
| १०. | २४ पेट्रोल ,तेल, वंगण | १.६७ | १.६७ | ०.०० |
| ११. | ५१ मोटार वाहने | १५.५० | १५.५० | ०.०० |
| | एकूण सर्व | १९८१.६५ | १९७८.४३ | ३.२२ |

२. सदर खर्च मागणी क्र. वाय-४, लेखाशीर्ष "२७०२- लहान पाटबंधारे ,०२-भूजल ००५- अन्वेषण (०१) (०१) भूजल संपत्तीचे अन्वेषण व विकास आस्थापना (योजनेतर) २७०२ ३९१८ " या लेखाशीर्षाखाली दर्शविण्यात यावा. तसेच संचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, पुणे यांना अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर उपलब्ध करुन दिलेल्या मासिक तरतूदीतून (Monthly Cash Flow) भागविण्यात यावा.

३. सदर शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra. gov.in या बेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक क्र २०११०३१७१९२१४८००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

(श.वि. दुर्वे )
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत:

१. संचालक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, पुणे
२. उपसंचालक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, सर्व
३. वरिष्ठ भूवैज्ञानिक , भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा,सर्व
४. महालेखापाल, महाराष्ट्र-१ मुंबई/२ नागपूर (लेखा परीक्षा /लेखा व अनुज्ञेयता)
५. वित्त विभाग, अर्थसंकल्प-१६ ( २ प्रती)
६. कक्ष अधिकारी/ लेखा अधिकारी,पापु-०४, पापु-२०
७. निवड नस्ती पापु-१५